महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट - क व जिल्हा तांत्रिक सेवा, गट-क संवर्गातील कर्मचा-यांना शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) अंतर्गत उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदावर निवडीद्वारे नियुक्तीसाठी महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२०१७.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: बिंदुना ३०१६/प्र.क्र.२५१/प्रशा-२,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १७ मे, २०१७.

**शासन परिपत्रक-**

महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट - क व जिल्हा तांत्रिक सेवा, गट-क संवर्गातील कर्मचा-यांना शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) अंतर्गत उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदावर निवडीद्वारे नियुक्ती देण्यासाठी रविवार, **दिनांक १३ ऑगस्ट, २०१७** रोजी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२०१७ फक्त **मुंबई** येथे घेण्यात येईल.

**२. उपलब्ध पदसंख्या:-**

**२.१** प्रस्तुत परीक्षेमधून भरावयाच्या पदांचा आरक्षणनिहाय तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | वर्गवारी | महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-क संवर्गामधून भरावयाची पदे | जिल्हा तांत्रिक सेवा, गट-क संवर्गामधून भरावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | अनुसूचित जाती | ४ | १२ |
| २ | अनुसूचित जमाती | २ | ६ |
| ३ | विमुक्त जाती (अ) | १ | ३ |
| ४ | भटक्या जमाती (ब) | १ | २ |
| ५ | भटक्या जमाती (क) | १ | ३ |
| ६ | भटक्या जमाती (ड) | ० | २ |
| ७ | विशेष मागास प्रवर्ग | १ | २ |
| ८ | खुला | २१ | ६२ |
| **एकूण** | | **३१** | **९२** |

**२.२** वर नमूद पदसंख्या व आरक्षणामध्ये बदल होण्याची शक्यता आहे.

**२.३** वि.जा.(अ), भ.ज.(ब), भ.ज. (क), व भ.ज. (ड) या प्रवर्गासाठी आरक्षित पदे आंतरपरिवर्तनीय असून आरक्षित पदांसाठी संबंधित प्रवर्गातील योग्य व पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास अद्ययावत शासन धोरणाप्रमाणे उपलब्ध प्रवर्गाच्या उमेदवाराचा विचार गुणवत्तेच्या आधारावर करण्यात येईल.

**२.४** परीक्षेच्या कोणत्याही टप्प्यावर मागासवर्गीयासाठी विहित केलेली शुल्क तसेच इतर पात्रता विषयक अटी/निकषांसंदर्भात कोणतीही सूट/सवलत घेतली असल्यास, अशा उमेदवारांची अमागास (सर्वसाधारण) पदावर शिफारस करण्यात येणार नाही.

**३. पात्रता :-**

**३.१** महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट - क व जिल्हा तांत्रिक सेवा, गट-क संवर्गातील कर्मचारी प्रस्तुत परीक्षेस अर्ज करण्यासाठी पात्र आहेत. इतर संवर्गातील (उदा.खाजगी अनुदानित शाळा, महानगरपालिका अंतर्गत शाळा, आश्रमशाळा मधील) कर्मचा-यांनी अर्ज करु नयेत.

**३.२** पात्र कर्मचा-यांची दिनांक १ जानेवारी, २०१७ रोजी सलग पाच वर्षे विनाखंड नियमित सेवा पूर्ण झालेली असणे आवश्यक आहे.

**३.३** नियमित सेवेचा कालावधी खालीलप्रमाणे गणण्यांत येईल :-

(१) नामनिर्देशनाने नेमणूक झालेल्या कर्मचा-यांच्या नियमित नियुक्तीच्या दिनांकापासून

(२) अनुकंपा तत्वावर नेमणूक झालेल्या कर्मचा-यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून

(३) अन्य कारणास्तव सेवा नियमित झालेल्या कर्मचा-यांच्या बाबतीत त्यांच्या सेवा नियमित केल्या संबंधीच्या शासन आदेशाच्या दिनांकापासून

(४) पदोन्नत कर्मचा-याच्या नियमित पदोन्नतीच्या दिनांकापासून

**३.४** कोणत्याही परिस्थितीत निम्न संवर्गातील पदावरील अभावित नियुक्तीचा कालावधी पात्रतेसाठी गणण्यात येणार नाही.

**३.५** संबंधित संवर्गाची सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा (पीआरटी) उत्तीर्ण न झालेले अथवा उत्तीर्ण होण्यापासून सूट दिलेली नाही, असे कर्मचारी प्रस्तुत परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र असणार नाहीत.

**३.६ महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट - क मधून प्रस्तुत परीक्षेव्दारे भरावयाच्या पदांकरीता फक्त संबंधित संवर्गातील कार्यरत व्यक्तीच पात्र असतील**.

**३.७ जिल्हा तांत्रिक सेवा, गट - क मधून प्रस्तुत परीक्षेव्दारे भरावयाच्या पदांकरीता फक्त संबंधित संवर्गातील कार्यरत व्यक्तीच पात्र असतील**.

**४.** उमेदवारांनी अर्ज केल्याची माहिती आपल्या विभाग/कार्यालय प्रमुखांना कळविणे आवश्यक असून, याकरिता ऑनलाईन पध्दतीने आयोगाकडे पाठविलेल्या अर्जाची प्रत संबंधित विभाग/कार्यालय प्रमुखांना सादर करणे आवश्यक आहे. उमेदवारांचा अर्ज विचारात घेण्यास विभाग/कार्यालय प्रमुखांना कोणताही आक्षेप असल्यास तसे विभाग/कार्यालय प्रमुखांने अर्ज स्वीकारण्याच्या अंतिम दिनांकापर्यंत आयोगास कळविणे आवश्यक आहे. मात्र अर्ज विचारात घेण्यास हरकत नसल्यास आयोगास तसे कळविण्याची आवश्यकता नाही; असेही उमेदवारांनी संबंधित विभाग/कार्यालय प्रमुखांना कळवावे.

**५. परीक्षेचे टप्पे**

**५.१** प्रस्तुत परीक्षा खालील दोन टप्प्यांमध्ये घेण्यात येईल:-

(१) लेखी परीक्षा - ४०० गुण (२) मुलाखत - ५० गुण.

**५.२** महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-क तसेच जिल्हा तांत्रिक सेवा, गट-क संवर्गातून भरावयाच्या पदाकरीता स्वतंत्र निकाल प्रक्रिया राबविण्यात येईल.

५.३ गुणांची सीमारेषा निश्चित करताना महाराष्ट्र शिक्षण सेवा,गट-क तसेच जिल्हा तांत्रिक सेवा, गट-क मधून निवडीद्वारे भरावयाची पदसंख्या स्वतंत्रपणे विचारात घेण्यात येईल व त्यानुसार गुणांची किमान सीमारेषा स्वतंत्रपणे निश्चित करण्यात येईल.

५.४ शिफारसपात्र उमेदवारांचा परस्पर गुणवत्ताक्रम लेखी परीक्षा व मुलाखतीमध्ये प्राप्त गुणांची एकत्रित बेरीज यांच्या आधारे आयोगाकडून तयार करण्यात आलेल्या गुणवत्ताक्रमानुसार निश्चित करण्यात येईल.

५.५ मुलाखतीस आमंत्रित केल्यानंतर पात्रतेसंदर्भातील सर्व आवश्यक मूळ प्रमाणपत्रे सादर करणे आवश्यक आहे. पात्रतेसंदर्भातील सर्व मूळ प्रमाणपत्रे मुलाखतीच्या वेळी सादर न केल्यास मुलाखत घेतली जाणार नाही. तसेच, शिफारस/नियुक्तीसाठी विचार करण्यात येणार नाही.

**६. शुल्क :-**

६.१ अमागास - रुपये ५२३/-        ६.२ मागासवर्गीय - रुपये ३२३/-

**७. परीक्षा केंद्र :**

| **परीक्षा केंद्र** | **केंद्र संकेतांक** |
|---|---|
| मुंबई | ३० |

**८. अर्ज करण्याची पध्दत :-**

८.१ प्रस्तुत परीक्षेसाठी फक्त ऑनलाईन पद्धतीने अर्ज स्वीकारण्यात येतील.

८.२ पात्र उमेदवाराला वेब-आधारित (Web-based) ऑनलाईन अर्ज https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळाद्वारे **दिनांक १७ मे, २०१७ ते दिनांक ६ जून, २०१७** या कालावधीतच सादर करणे आवश्यक राहील.

८.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://mahampsc.mahaonline.gov.in तसेच www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

८.४ आयोगास अर्ज सादर करताना माध्यमिक शालांत प्रमाणपत्रावर असलेल्या नावाप्रमाणेच नावाची नोंदणी करणे व आयोगास अर्ज सादर करणे आवश्यक आहे. अन्यथा, आयोगाच्या सूचनांचे उल्लंघन समजून कारवाई करण्यात येईल.

८.५ आयोगास चुकीची माहिती सादर करणा-या उमेदवारास सदर परीक्षेसाठी व यापुढील सर्व निवडीकरिता अपात्र ठरविण्यात येईल.

८.६ आयोगास अर्ज सादर केल्यानंतर विहित मुदतीत परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

८.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

८.७.१ शुल्क भरण्याकरीता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील " माझे खाते " या लिंकवर क्लिक करावे.

८.७.२ "माझे खाते" या लिंकवर क्लिक केल्यानंतर "माझे ॲप्लीकेशन" सदरातील 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंकवर क्लिक करावे.

८.७.३ 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंक वर क्लिक केल्यानंतर अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या/न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. –Unpaid॰ लिहिलेल्या पद/परीक्षेसमोर –Pay Now॰ अशी लिंक उपलब्ध असेल.

८.७.४ " Pay Now" या लिंकवर क्लिक केल्यानंतर ३ पर्याय उपलब्ध होतील :- **(अ)** ऑनलाईन पेमेंट **(ब)** नागरी सुविधा केंद्र **(क)** चलनाव्दारे

८.७.५ क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन परीक्षा शुल्क अदा करता येईल.

८.७.६ नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. सदर कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

८.७.७ चलनाव्दारे परीक्षा शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

८.७.८ भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर केल्यास त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

८.७.९ विहित पध्दतीने अर्ज सादर करुन शुल्क भरण्याची कार्यवाही, तसेच भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही दिनांक **६ जून, २०१७** रोजी **२३.५९** वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

८.७.१० चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये दिनांक **७ जून**, **२०१७** पर्यंत बॅकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परीक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही, तसेच परीक्षा शुल्काचा परतावाही केला जाणार नाही.

८.७.११ ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलमध्ये परीक्षा शुल्काचा भरणा झाला आहे किंवा कसे याची स्थिती (status) अवगत होईल. त्याची उमेदवाराने अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वीच तपासणी करुन खात्री करणे अथवा परीक्षा शुल्काचा भरणा झाल्याबाबतची स्थिती उपलब्ध नसल्यास पुन्हा शुल्क भरण्याची अथवा चलन घेण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे. विहित दिनांकानंतर यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या तक्रारीची दखल घेतली जाणार नाही.

९. अर्जात नमूद केलेल्या माहितीच्या आधारे उमेदवार परिपत्रकातील विहित अर्हतेबाबतच्या अटींची पूर्तता करतात असे समजून पात्रता न तपासता आयोगाकडून उमेदवारांना तात्पुरता प्रवेश दिला जाईल. परंतु परीक्षेपूर्वी अथवा परीक्षेनंतर कोणत्याही टप्प्यावर, उमेदवाराने अर्जात नमूद केलेली माहिती चुकीची वा खोटी असल्याचे अथवा उमेदवार विहित अर्हतेची पूर्तता करीत नसल्याचे आयोगास आढळल्यास अशा उमेदवारांची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल आणि त्याबाबतचा आयोगाचा निर्णय अंतिम राहिल.

**१०. सर्वसाधारण :-**

१०.१ प्रस्तुत परीक्षा ही स्पर्धा परीक्षा असून पदोन्नतीसाठी पात्रता परीक्षा (Qualifying Examination) नाही. प्रस्तुत परीक्षेच्या निकालाच्या आधारे आयोगाकडून शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची सक्षम प्राधिका-याकडून पात्रता तपासण्याच्या अधीन राहून नियुक्ती देण्याची कार्यवाही करण्यात येईल. सदर परीक्षेमधील उमेदवारांच्या कामगिरीच्या (Performance) आधारे नियुक्ती मागण्याचा उमेदवारास कोणताही हक्क असणार नाही.

१०.२ परीक्षेस अर्ज सादर केल्यानंतर अथवा परीक्षा दिल्यानंतर उमेदवाराने राजीनामा दिल्यास अथवा कोणत्याही कारणास्तव नोकरी सोडल्यास अथवा विभागाने सेवा समाप्त केल्यास अथवा धारणाधिकार न ठेवता

संवर्गबाह्य पदावर नेमणूक झाल्यास सदर परीक्षेच्या निकालाच्या आधारे संबंधित उमेदवार नियुक्तीसाठी पात्र असणार नाही.

**११. प्रवेशप्रमाणपत्र :-**

११.१ प्रस्तुत परीक्षेपूर्वी सर्वसाधारणपणे ७ दिवस अगोदर प्रवेश प्रमाणपत्र उमेदवाराच्या प्रोफाईलदवारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

११.२ परीक्षेच्या वेळी उमेदवाराने स्वत:चे प्रवेश प्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

११.३ परीक्षेस येतेवेळी स्वत:च्या ओळखीच्या पुराव्यासाठी स्वत:चे आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, पासपोर्ट, पॅन कार्ड किंवा स्मार्ट कार्ड प्रकारचे ड्रायव्हिंग लायसेन्स यापैकी किमान कोणतेही एक मूळ ओळखपत्र व त्याची छायांकित प्रत सोबत आणणे अनिवार्य आहे.

११.४ परीक्षेच्या वेळी प्रवेश प्रमाणपत्र व इतर ओळखीच्या पुराव्यासह उमेदवाराने अद्ययावत कार्यालयीन ओळखपत्र सादर करणे आवश्यक आहे.

**१२. परीक्षेस प्रवेश**

१२.१ फक्त पेन, पेन्सिल, प्रवेशप्रमाणपत्र, ओळखीचा मूळ पुरावा व त्याची छायांकित प्रत अथवा प्रवेशप्रमाणपत्रावरील सूचनेनुसार आयोगाने परवानगी दिलेल्या साहित्यासह उमेदवाराला परीक्षा कक्षात प्रवेश देण्यात येईल.

१२.२ डिजीटल डायरी, पेजर, मायक्रोफोन, मोबाईल फोन, कॅमेरा अंतर्भूत असलेली कोणत्याही प्रकारची साधने, सिमकार्ड, ब्लू टूथ, दूरसंचार साधने म्हणून वापरण्या योग्य कोणतीही वस्तू, इलेक्ट्रॉनिक उपकरणे, वहया, नोटस, परवानगी नसलेली पुस्तके, बॅग्ज, परिगणक (calculator) इत्यादी प्रकारची साधने / साहित्य परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच परीक्षा कक्षात आणण्यास, स्वत:जवळ बाळगण्यास, त्याचा वापर करण्यास अथवा त्याच्या वापरासाठी इतरांची मदत घेण्यास सक्त मनाई आहे. असे साहित्य आणल्यास ते परीक्षा केंद्राबाहेर ठेवण्याची व त्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील.

१२.३ आयोगाने परवानगी नाकारलेले कोणत्याही प्रकारचे अनधिकृत साधन/साहित्य परीक्षेच्यावेळी संबंधित उपकेंद्राच्या मुख्य प्रवेशद्वारावरच ठेवावे लागेल. अशा साधन/साहित्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या नुकसानीस आयोग, जिल्हा प्रशासन किंवा शाळा/महाविद्यालय व्यवस्थापन जबाबदार राहणार नाही.

१२.४ उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या अर्जावरील स्वाक्षरी, हजेरीपटावरील स्वाक्षरी व अन्य सर्व प्रकारच्या पत्रव्यवहारावरील स्वाक्षरी एकच असणे व त्यामध्ये कोणत्याही प्रकारचा फरक/तफावत असता कामा नये. विविध ठिकाणच्या स्वाक्षरीमध्ये फरक/तफावत आढळून आल्यास संबंधित उमेदवाराची उमेदवारी रद्द करण्यात येईल व आयोगाच्या स्वेच्छाधिकारानुसार इतरही कायदेशीर/नियमानुसार कारवाई करण्यात येईल.

१३. प्रस्तुत परिपत्रकामध्ये परीक्षेसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज स्वीकारण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क, निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया, परीक्षा योजना, अभ्यासक्रम इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरील मर्यादित विभागीय परीक्षा अंतर्गत **'उमेदवारांना सर्वसाधारण सूचना'** तसेच **"परीक्षा योजना"** विभागातील **“महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन**

**शाखा) मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा”** मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती व परिपत्रक अधिकृत समजण्यात येईल.

**१४.** प्रस्तुत परिपत्रक आयोगाच्या www.mpsc.gov.in तसेच https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

**१५.** सदर परिपत्रकासोबतच्या **"विवरणपत्र-१"** मध्ये परीक्षेची योजना व अभ्यासक्रमाचा समावेश केला आहे.

**१६.** सदर परिपत्रक रजेवर/प्रतिनियुक्तीवर असणा-या कर्मचा-यांसह सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावे.

**१७.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५१७१२४७४०३२२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh B Mamadapure

Digitally signed by Santosh B Mamadapure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400058, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, cn=Santosh B Mamadapure
Date: 2017.05.17 12:59:01 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
२. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
४. निवडनस्ती, का.प्रशा-२.

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: बिंदुना ३०१६/प्र.क्र.२५१/प्रशा-२**
**सोबतचे सहपत्र**

**विवरणपत्र - १**
**महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षेची परीक्षा योजना व अभ्यासक्रम**

**- : परीक्षा योजना :-**

| प्रश्नपत्रिका क्रमांक व संकेतांक | विषय | दर्जा | प्रश्नसंख्या | गुण | माध्यम | कालावधी | परीक्षेचे स्वरुप |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **पेपर क्र. १** | मराठी | बारावी | १५ | ३० | मराठी | एक तास | वस्तुनिष्ठ बहुपर्यायी |
| | इंग्रजी | बारावी | १५ | ३० | इंग्रजी | | |
| | सामान्य अध्ययन | बारावी | ४५ | ९० | मराठी व इंग्रजी | | |
| | शासनाशी संबधित निवडक कायदे, संस्था इत्यादी | विभागामध्ये काम करण्यासाठी आवश्यक असलेले ज्ञान. | २५ | ५० | | | |
| **पेपर क्र. २** | शासनाशी व विभागाशी संबधित नियम, कायदे, इत्यादी | विभागामध्ये काम करण्यासाठी आवश्यक असलेले ज्ञान. | १०० | २०० | मराठी व इंग्रजी | एक तास | |

**-:अभ्यासक्रम:-**

**(१) पेपर क्रमांक -१**

| अ.क्र. | घटक | गुण |
|---|---|---|
| १. | **मराठी -** सर्वसामान्य शब्द संग्रह, वाक्यरचना, व्याकरण, म्हणी व वाक्प्रचार यांचा अर्थ आणि उपयोग, तसेच उता-यांवरील प्रश्नांची उत्तरे. | ३० |
| २. | **इंग्रजी -** Common vocabulary, Sentence structure, Grammar, Use of idioms and phrases & and their meaning and Comprehension of passage. | ३० |
| ३. | **सामान्य ज्ञान** | |
| | **(१) गणित (इयत्ता बारावी अनुसार)-** | ३० |
| | **(२) बुध्दीमत्ता चाचणी** | २० |
| | **(३) चालू घडामोडी.** | १० |
| | **(४) सामान्य ज्ञान -** दैनंदिन घटना, नेहमीचे अनुभव, धर्म, साहित्य, राजकारण, शास्त्र, सामाजिक व औद्योगिक सुधारणा, क्रीडा या क्षेत्रातील महान व्यक्तींची कार्ये, सर्वसाधारणपणे भारताच्या विशेषत: महाराष्ट्राच्या इतिहासाची व भूगोलाची रूपरेषा यांवरील प्रश्न. | ३० |

| | | |
|---|---|---|
| ४. | **शासनाशी संबधित निवडक कायदे, संस्था इत्यादी** | ५० |
| | (१) माहितीचा अधिकार अधिनियम, २००५. | |
| | (२) महाराष्ट्र राज्य लोकसेवा (अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जमाती, भटक्या जमाती/विशेष मागास प्रवर्ग व इतर मागास वर्ग यांचेकरिता आरक्षण) अधिनियम, २००१ (महा. अधिनियम क्र.८/२००४). | |
| | (३) महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम,२०१५ (सेवा हमी कायदा). | |
| | (४) शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५. | |
| | (५) शासनाची विधीविषयक कामकाज चालविण्याची नियमावली, १९८४ (नियम क्रमांक ९२ व १०९). | |
| | (६) शाळा न्यायाधीकरण, सर्वोच्च व उच्च न्यायालयीन कामकाज व कार्यपध्दती (याचिका, अवमान याचिका, जनहित याचिका, सु-मोटो याचिका इत्यादी). | |
| | (७) मानवी हक्क आयोग. | |
| | (८) राज्य बाल हक्क संरक्षण आयोग. | |

**(२) पेपर क्रमांक - २**

| क्र | घटक व उपघटक | एकुण गुण |
|---|---|---|
| | भारताचे संविधान (सेवा विषयक बाबी व शिक्षणासंबंधीत कलमे) संसद व विधानमंडळ कामकाज व विविध समित्या. | १० |
| | (१) महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण अटी व शर्ती) नियम, १९८१. | ४० |
| | (२) महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९. | |
| | (३) महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९. | |
| | (४) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा, निलंबन काळातील प्रदाने) नियम, १९८१. | |
| | (५) महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१. | |
| | (६) महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१. | |
| | (७) महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, १९८२. | |
| | (८) महाराष्ट्र नागरी सेवा (अंशराशीकरण) नियम, १९८४. | |
| | (९) मुंबई नागरी सेवा (प्रवासभत्ता) नियम, १९५९. | |
| | (१०) विभागीय चौकशी नियम पुस्तिका. | |
| ३. | (१) माध्यमिक शाळा संहिता . | ५० |
| | (२) महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) अधिनियम, १९७७ व नियमावली, १९८१. | |

| | | |
|---|---|---|
| | (३) महाराष्ट्र शैक्षणिक परिसंस्था (व्यवस्थापन) अधिनियम, १९७६. | |
| | (४) महाराष्ट्र शैक्षणिक परिसंस्था (व्यवस्थापन - हस्तांतरण) अधिनियम, १९७१. | |
| | (५) महाराष्ट्र स्वयं-अर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२. | |
| | (६) महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (कॅपिटेशन फी घेण्यास प्रतिबंध) अधिनियम,१९८७ व महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन) अधिनियम, २०११. | |
| | (७) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ अधिनियम, १९६५/ विनियम, १९७७ | |
| | (८) विविध मंडळाच्या शाळा (CBSE, ICSE, IB, IGCSE) कार्यपध्दती. | |
| | (९) बालकांच्या मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९, दुरुस्ती अधिनियम, २०१२ व नियमावली, २०११ . | |
| | (१०) राष्ट्रीय शिक्षक शिक्षण परिषद (मान्यता, निकष, कार्यपध्दती) विनियमन,२०१४ . | |
| ४. | **विभागाशी संबंधित विषय (२५ प्रश्न / ५० गुण)** | |
| ४.१ | (१) शालेय शिक्षण विभागाची संरचना (प्रशासकीय विभाग व विविध संचालनालय) व त्यांच्या कार्यपध्दती. | १० |
| | (२) राज्यस्तरीय संस्थाची कार्यपध्दत (शिक्षण व्यवसाय मार्गदर्शन, विज्ञान संस्था, आंग्लभाषा इत्यादी) | |
| | (३) प्रादेशिक विद्या प्राधिकरण, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था. | |
| | (४) अधिकाऱ्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या (संचालक, सह संचालक, उपसंचालक, सहायक संचालक, प्रशासन अधिकारी, शिक्षणाधिकारी, गट शिक्षणाधिकारी, अधीक्षक (वेतन पथक), अधीक्षक (पोषण आहार), जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, इत्यादी) | |
| ४.२ | (१) केंद्र/राज्य शासन अर्थसहाय्यिता विद्यार्थी वैयक्तिक लाभाच्या योजना/स्वरुप व कार्यपध्दती (प्राथमिक व माध्यमिक स्तरावरील). | २० |
| | (२) सर्व शिक्षा अभियान व राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान. | |
| | (३) मानव विकास अभियान (शिक्षण संबंधित). | |
| | (४) प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम. | |
| ४.३ | राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखडा (एन.सी.एफ. २००५), राज्य अभ्यासक्रम आराखडा (एस.सी.एफ. २०१० ) प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक, डी.एल.इ.डी, पदविका/ पदवी (बी.एड.) अभ्यासक्रम व मूल्यमापन, शिक्षणातील नवीन प्रवाह . | १० |
| ४.४ | संगणक व माहिती तंत्रज्ञान - शैक्षणिक क्षेत्रातील संगणकाचा वापर, डाटा कम्युनिकेशन, नेटवर्कींग आणि वेब टेक्नॉलॉजी, शासनाचे कार्यक्रम - मिडीया लॅब एशिया, विद्या वाहिनी, ज्ञान वाहिनी, सामुहिक माहिती केंद्र, ई- गव्हर्नस, शालार्थ, सरल प्रणाली, U-DISE, DBT, व्हर्च्युअल क्लासरुम, डिजीटल -स्कूल, दैनंदिन माहिती देवाण-घेवाण तंत्र - ई-मेल, व्हॉट्स -ॲप, स्काईप. | १० |

| | | |
|---|---|---|
| ५. | (१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१.<br>(२) महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम,१९६६ व पंचायतराज व्यवस्थापन- ग्रामपंचायती, पंचायत समित्या, जिल्हा परिषदा.<br>(३) महानगरपालिका, नगर पालिका, नगर परिषद, नगर पंचायत कामकाज (कायदे).<br>} **शिक्षणा संबंधित तरतुदी** | २० |
| ६. | **(१)** मुंबई वित्तीय नियम, १९५९ (प्रकरण १, २, ७, ९, ११ व १२). | ३० |
| | **(२)** महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका . | |
| | **(३)** महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५. | |
| | **(४)** महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ . | |
| | **(५)** शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियम पुस्तिका (शासन निर्णय दिनांक १.१२.२०१६). | |